भा.प्र.से. अधिका-यांनी मत्ता व
दायित्वांची विवरणत्रे Online पध्दतीने
दिनांक १५.९.२०१४ पूर्वी सादर करणेबाबत

# महाराष्ट्र शासन
## सामान्य प्रशासन विभाग
## शासन परिपत्रक क्रमांकः भाप्रसे-१५१४/प्र.क्र. २६५/२०१४/९

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
तारीख: १२ ऑगस्ट,२०१४

**वाचा -**

१) **अतिरिक्त सचिव व आस्थापना अधिकारी, कार्मिक व प्रशिक्षण विभाग, नवी दिल्ली यांचे अर्धशासकीय पत्र क्र.५(१)/२०१४-EO(PR), दि.२५.७.२०१४**

**प्रस्तावना -**

लोकपाल व लोकआयुक्त अधिनियम, २०१३ मधील कलम ४४ नुसार लोकसेवकाने त्यांची व त्यांच्या कुटुंबातील सदस्यांची (पती/पत्नी व अवलंबून असणारी मुले) दिनांक ३१ मार्च रोजीची स्थिती दर्शविणारी वार्षिक मत्ता व दायित्वाची विवरणपत्रे दरवर्षी दि. ३१ जुलैपूर्वी सक्षम प्राधिकाऱ्यास सादर करणे आवश्यक आहे. प्रस्तुत अधिनियमातील कलम ५९ अन्वये प्राप्त अधिकारानुसार केंद्र शासनाने लोकसेवक (मत्ता व दायित्वांचे वार्षिक विवरणपत्र सादर करणे व विवरणपत्रे दाखल करण्यामधून सूट देण्यासाठी मत्त्यांची मर्यादा ) नियम, २०१४ हे दिनांक १४.७.२०१४ रोजी अधिसूचित केले आहेत. या वर्षाकरिता ज्या लोकसेवकांनी त्यांना लागू असलेल्या अन्य नियमानुसार वार्षिक मालमत्ता विवरणपत्रे दाखल केलेले असतील अशा लोकसेवकांनी दिनांक १ ऑगस्ट, २०१४ रोजीची स्थिती दर्शविणारी सुधारित मत्ता व दायित्वांची विवरणपत्रे दिनांक १५ सप्टेंबर, २०१४ पूर्वी सक्षम प्राधिकाऱ्यांकडे विहित नमुन्यात सादर करण्याची तरतूद सदर नियमामध्ये करण्यात आली आहे. प्रस्तुत नियमानुसार भारतीय प्रशासन सेवेतील अधिकारी हे देखील त्यांची मत्ता व दायित्वांची विवरणपत्रे दाखल करतील असा निर्णय केंद्र शासनाने घेतला असल्याचे वाचा येथील पत्रान्वये कळविण्यात आले आहे.

**शासन परिपत्रक -**

उपरोक्त पार्श्वभूमी विचारात घेवून महाराष्ट्र संवर्गातील भारतीय प्रशासन सेवेतील अधिकाऱ्यांनी दिनांक १ ऑगस्ट, २०१४ ची स्थिती दर्शविणारी त्यांची स्वत:ची व त्यांच्या कुटुंबातील इतर सदस्यांची ( पत्नी/पती व अवलंबुन असणारी मुले/मुली ) मत्ता व दायित्वांची विवरणपत्रे दिनांक १५ संप्टेबर, २०१४ पूर्वी खाली दिलेल्या कार्यपध्दतीनुसार Online पध्दतीने सादर करावीत अशा सूचना या परिपत्रकान्वये देण्यात येत आहेत.

१) लोकपाल व लोकआयुक्त अधिनियम, २०१३ मधील कलम ५९ नुसार प्राप्त झालेल्या अधिकारानुसार केंद्र शासनाने लोकसेवक ( मत्ता व दायित्वांचे वार्षिक विवरणपत्र सादर करणे व विवरणपत्रे दाखल करण्यामधून सूट देण्यासाठी मत्त्यांची मर्यादा ) नियम, २०१४ [ Public Servants (Furnishing of Information and Annual Return of Assets and Liabilities and the Limits for Exemption of Assets in Filing Returns) Rules, 2014] हे नियम दिनांक १४.७.२०१४ रोजी अधिसूचित केले आहेत.

२) वरील नियमानुसार भारतीय प्रशासन सेवेतील अधिकाऱ्यांनी दिनांक १ ऑगस्ट,२०१४ ची स्थिती दर्शविणारे त्यांची मत्ता व दायित्वांची विवरणपत्रे दिनांक १५ सप्टेंबर, २०१४ पूर्वी Online पध्दतीने सादर कराव्यात असा निर्णय केंद्र शासनाने घेतला आहे.

३) राज्य संवर्गातील सर्व भारतीय प्रशासन सेवेतील अधिकाऱ्यांनी मत्ता व दायित्वांची विवरणपत्रे Online पध्दतीने सादर करताना खालील कार्यपध्दतीचा अवलंब करावा :-.

(अ) मत्ता व दायित्वांची विवरणपत्रे Online पध्दतीने सादर करण्यासाठी केंद्र शासनाने कार्मिक व प्रशिक्षण विभागाच्या www.persmin.nic.in या संकेतस्थळावरील SPARROW या संगणकीय प्रणालीमध्येच Property Related Information System (PRISM) ही नवीन संगणकीय प्रणाली उपलब्ध करून दिलेली आहे [Navigation tab for PRISM > Declaration]. सदर विवरणपत्रे संगणक प्रणालीमध्ये उपलब्ध असलेल्या नमुना क्रमांक १ ते ४ मध्ये सादर करावयाची आहेत.

(ब) दिनांक १ ऑगस्ट, २०१४ ची स्थिती दर्शविणारे मत्ता व दायित्वांची विवरणपत्रे PRISM या संगणकीय प्रणालीमध्ये सर्व भारतीय प्रशासन सेवेतील अधिकाऱ्यांनी ONLINE पध्दतीने भरून सादर करावीत .

(क) SPARROW या संगणकीय प्रणालीसाठी भाप्रसे अधिकाऱ्यांना देण्यात आलेला User id व password यांचाच वापर करून मत्ता व दायित्वांची विवरणपत्रे अधिकाऱ्यांनी सादर करावीत व त्यांना उपलब्ध करून देण्यात आलेल्या Digital Signature Certificate (DSC) चा वापर करून सदर विवरणपत्रे अधिप्रमाणित करावीत.

(ड) कोणत्याही कारणामुळे संबंधित अधिकारी Digital Signature Certificate (DSC) वापरू शकत नसतील अथवा त्यांना Digital Signature Certificate (DSC) प्राप्त झाले नसेल अशा अधिकाऱ्यांनी मत्ता व दायित्वांची विवरणपत्रे प्रत्यक्षात भरून व स्वाक्षरी करून ती SCAN करावीत व PRISM या संगणकीय प्रणालीमधील“ Upload Form” चा वापर करून SCAN केलेली विवरणपत्रे Online पध्दतीने सादर करावीत.

(इ) मत्ता व दायित्वांची विवरणपत्रे Online पध्दतीने सादर करण्यामध्ये अधिकाऱ्यांना कोणतीही अडचण उद्भवल्यास सहाय्यता केंद्रास support-sparrow@nic.in वर ईमेल पाठविण्यात यावा अथवा ०११-२३०९३४१६ या दूरध्वनी क्रमांकावर संपर्क साधावा.

४) वरील सूचना विचारात घेवून राज्य संवर्गातील सर्व भारतीय प्रशासन सेवेतील अधिकाऱ्यांनी त्यांची दिनांक ०१ ऑगस्ट, २०१४ ची स्थिती दर्शविणारी मत्ता व दायित्वांची विवरणपत्रे

वरीलप्रमाणे Online पध्दतीनुसार कोणत्याही परिस्थितीत दिनांक १५ सप्टेंबर,२०१४ पूर्वी भरावीत. तद्नंतर पुढील वर्षापासून लोकसेवक ( मत्ता व दायित्वांचे वार्षिक विवरणपत्र सादर करणे व विवरणपत्रे दाखल करण्यामधून सूट देण्यासाठी मत्त्यांची मर्यादा ) नियम, २०१४ या नियमामधील तरतूदीनुसार व वरील कार्यपध्दतीनुसारच वार्षिक मत्ता व दायित्वांची विवरणपत्रे सादर करावीत.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१४०८११११३००४४४३०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Bhagwan Sahai
Digitally signed by Bhagwan Sahai
DN: c=IN, o=All India Service, ou=IAS, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Bhagwan Sahai
Date: 2014.08.12 11:08:08 +05'30'

**(डॉ. भगवान सहाय )**
प्रधान सचिव (सेवा), महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा.मुख्य मंत्री यांचे प्रधान सचिव,
२. मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव,
३. मा.मुख्य सचिव यांचे उपसचिव,
४. सर्व मंत्रालयीन विभागांचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,
५. महाराष्ट्र संवर्गातील सर्व भाप्रसे अधिकारी ,
६. उप सचिव (भा.पो.से. कक्ष ), गृह विभाग, जागतिक व्यापार केंद्र, कफ परेड, मुंबई,
७. उप सचिव ( भा.व.से. कक्ष ), महसूल व वन विभाग, मंत्रालय,मुंबई,
८. कार्यासन - ९ अ/१०, सामान्य प्रशासन विभाग,
९. निवड नस्ती